**मासेमारी नौकांचे यांत्रिकीकरण या योजनेअंतर्गत मंजूर प्रस्तावांना ३५% निधी वितरीत करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- मत्स्यवि-२०१०/प्र.क्र.२६४/पदुम १४**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक : ८.२.२०११**

**प्रस्तावना :-**

मासेमारी नौकांचे यांत्रिकरण योजनेंतर्गत मच्छिमारांना यांत्रिक नौका बांधणीकरीता राष्ट्रीय सहकार विकास निगम पुरस्कृत योजनेखाली अर्थसहाय्य देण्याची योजना शासनामार्फत राबविण्यात येते. सदर योजनेंतर्गत अर्थसहाय्य मंजूरीच्या प्रस्तावावर निर्णय घेण्यासाठी गठीत करण्यात आलेल्या प्रदत्त समितीच्या दिनांक ७.९.२०१० रोजी झालेल्या बैठकीमध्ये सन २०१०-११ मध्ये यांत्रिक नौकांच्या गटांना ३५% अर्थसहाय्य मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राष्ट्रीय सहकारी विकास निगम पुरस्कृत योजनेंतर्गत अर्थसहाय्य मंजूरीच्या प्रस्तावांबाबत निर्णय घेण्यासाठी गठित करण्यात आलेल्या प्रदत्त समितीने दि.७.९.२०१० रोजी झालेल्या बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयानुसार मासेमारी नौकांचे यांत्रिकीकरण योजनेंतर्गत मच्छिमारांना यांत्रिक नौका बांधणीकरीता राष्ट्रीय सहकार विकास निगम पुरस्कृत योजनेखाली सोबत जोडलेल्या परिशिष्ट'अ' मधील संस्थांच्या १४० गटांना मंजूर झालेल्या अर्थसहाय्यातून गटांच्या प्रकल्प किंमतीच्या ३५% टक्क्यापैकी २५% रा.स.वि.नि. हिश्श्यापोटी उपलब्ध असलेल्या तरतुदीच्या ८०% तरतूद (राष्ट्रीय सहकारी विकास निगम हिस्सा २०% निधीपोटी रु.६४८.७८ लक्ष व खास विमोचक भागभांडवल ५% निधीपोटी रु.१५८.२० लक्ष) म्हणजेच रु. ८,०६,९८,०००/- (अक्षरी रुपये आठ कोटी सहा लक्ष अठ्ठयाण्णव हजार फक्त) इतकी रक्कम वितरित करण्यास शासन मंजूरी देत आहे. सदर रकमेचे वितरण सर्व गटांना मंजूर प्रकल्प किंमतीच्या प्रमाणात उपलब्ध तरतुदीच्या मर्यादेत करण्यात यावे. सदरची मंजूरी संस्थांकडून कर्जाची नियमितपणे परतफेड करण्याबाबतचे हमीपत्र घेण्याच्या अधीन राहून देण्यात येत आहे. उर्वरित १०% निधी हा राज्य हिश्यापोटी संबंधित जिल्हा नियोजन व समिती यांचेमार्फत उपलब्ध करुन घेण्याची जबाबदारी ही संबंधित जिल्हयाच्या सहायक आयुक्त, मत्स्यव्यवसाय (तां) यांची राहील. मंजूर करण्यात आलेल्या प्रस्तावांना १०% निधी हा जिल्हा योजना मत्स्यव्यवसाय सहकारी संस्थांना अर्थसहाय्य या योजनेतून संबंधित जिल्हयांच्या जिल्हाधिकारी यांनी उपलब्ध करुन घ्यावा.

यासाठी येणारा खर्च चालू वर्षी (सन २०१०-११) उपलब्ध असलेल्या तरतुदीतून व खालील लेखाशिर्षांतर्गत भागविण्यात यावा-

१) भागभांडवल (५%) : मागणी क्र.डी-११
४४०५-मत्स्यव्यवसायावरील भांडवली खर्च
१९५-सहकारी संस्थाना मदत
पंचवार्षिक योजनांतर्गत योजना
(०१)(०३) यांत्रिक नौका रा.स.वि.नि. हिस्सा
(४४०५ ०१६८)
३३ अर्थसहाय्य

२) खास विमोचक भागभांडवल (५%) : मागणी क्र.डी-११
रा.स.वि.नि. हिस्सा(२०%)

४४०५-मत्स्यव्यवसायावरील भांडवली खर्च
१९५-सहकारी संस्थाना मदत
पंचवार्षिक योजनांतर्गत योजना
(०१)(१०) यांत्रिक नौका रा.स.वि.नि. हिस्सा
(४४०५ ०५५१)
३३ अर्थसहाय्य

सदर शासन निर्णय नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ५१/११/अर्थ-१५, दिनांक २९.१.२०११ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

हा आदेश महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावरुन प्रसारित करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०११०२०८१८५०५७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने

सोबत : परिशिष्ट : अ

सही/-

**( ज.ल.पावरा )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

आयुक्त, मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई (५ प्रती)
प्रादेशिक उपायुक्त, मत्स्यव्यवसाय, मुंबई
सहाय्यक आयुक्त, मत्स्यव्यवसाय ठाणे / मुंबई / रायगड / रत्नागिरी / सिंधुदुर्ग.
महालेखापाल-१ महाराष्ट्र राज्य (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
जिल्हा कोषागार अधिकारी,मुंबई, ठाणे, रायगड, रत्नागिरी
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
वित्त विभाग (व्यय-१/अर्थसंकल्प-१५)
अवर सचिव(पदुम-१६), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
निवडनस्ती